# षष्ठ खंड

—०—

## [ विकट चरित्र ]

### ब्रह्मपंचकाचें स्वरूपवर्णन

सूत :– मुनिहो ! दक्षाने विचारल्यावर मुद्गलाने कल्याणकारक असे विकटचरित्र सांगितले. ते असेः एकदां आदिमाया आपल्या महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती इत्यादि देवीसख्यांशी बोलत बसली असतां महाकालीप्रमुख मुख्य देवींनीं आदिमायेस विचारले 'धर्मार्थादि चारी पुरषार्थ देणारी सर्वरूप व सर्वप्रकाशिनी अशी तूं सर्वशक्तोची मूल प्रकृती असतां, तू नेहमी गणपतीचे ध्यान करतेस, त्याची पूजा करतेस व त्याची नांवे घेतेस, याचे रहस्य काय! कृपा करून तूं आम्हांस उपदेश कर, म्हणजे आम्हींही गणेशांची उपासना करण्याचा निश्चय करू. **आदिदेवी** :– सख्यानों ! आम्हां चौघांची उत्पत्ति गणपतिपासून झाली आहे. (१) मी स्वतः, जे सर्व नामरूपात्मक आहे त्यामध्ये वास्तव्य करते. नामरूपात्मकाला जन्ममृत्यु आहे; 'मला असत स्वानंद-मय' ब्रह्म म्हणतात. (२) ह्या उत्पत्ति–विनाश पावणाऱ्या नामरूपात्मक वस्तूंची जी अभिमानी देवता, जी आधार देवता

आहे, ती सूर्य होय. तिला सत्यात्मक अथवा ‘ सद्‌ब्रह्म ’ ह्मणतात. ( ३ ) वरील असद्‌ब्रह्म सद्‌ब्रह्म यांची जी साम्यावस्था तो विष्णु होय. यालाच ‘ साम्यरूप ’ असे म्हणतात. नामरूपे अनंत असतात, पण त्यांचा अभिमानी एकच असतो. या दोघांची ह्मणजे सदसतांची जी साम्यावस्था ती आनंदमय आहे. हेच विष्णूचे स्वरूप आहे. सदसतांचा जो अभेद तो विष्णु होय. ( ४ ) या सत्, असत् व सम यापैकी कोणतेही रूप नसणे ते ‘ नेति ’ रूप आहे. हे शिवाचे स्वरूप आहे. सत्, असत् व सम या तिन्हीचे अंतर्यामी तुर्य ह्मणजे चतुर्थ ब्रह्म आहे. हे शिवरूप, मागील तिन्ही रूपापेक्षा श्रेष्ठ आहे. या चौघांचा जो संयोग ह्मणजे सत्, असत्, सम व नेति या चारी ब्रह्मामधील जो भेद आहे त्याचा नाश ज्याने होतो तो संयोग ‘ स्वानंद ब्रह्म ’ आहे. हा स्वानंद स्वसंवेद्य आहे, हा दाखविता येणार नाही, किंवा सांगूनही समजणार नाही, हे स्वानंदी ब्रह्म, एक योगसेवा केली तरच प्राप्त होईल.

## संयोग–वियोग

( १ ) येथे त्वंपद, तत्‌पद व असिपद यांची व्यवस्था अशी आहेः ‘ असि ’ पदामध्ये असत्, सत्, सम, नेति व स्वानंद ह्या सर्वांत स्वसंवेद्य व स्वानंद ब्रह्मांचा निवास असतो. ‘ तत् ’ पदामध्ये जागृत, स्वप्न, सुषुप्ति यांची निमित्तमात्र असणारी निर्गुण आत्मस्वरूपी ब्रह्मे आहेत. ‘ त्वं ’ पदाचे ठिकाणी जागृत, स्वप्न, सुषुप्ति, तुरीय, यामध्ये अभेद स्वरुपाने असणारी सगुण आत्मरूप ब्रह्मे आहेत. या प्रकारे हा सर्व आत्ममूलक विस्तार आहे. येथे असदादि ब्रम्हांचा संयोग पूर्ण व स्वसवेद्य होतो. तोच स्वानंदस्वरूपी

पांचवे ब्रह्म आहे. या स्वसंवेद्य ब्रह्माची प्राप्ति अस्तित्स्वरूपी संप्रज्ञात समेने मात्र व्हावयाची असते. आता वर जी पांच ब्रह्मांची मालिका सांगितली आहे व ज्यावरच ब्रह्माचा आरोप केला आहे, त्या ब्रह्मापासून (ह्मणजे सर्व पांची ब्रह्मापासून) निर्विकारी आत्मा एकीकडे काढला म्हणजे अयोग सिद्ध होतो. नंतर वर सांगितलेला संयोग व आता सांगितलेला अयोग यांचा योग केला म्हण.जे आत्मा ब्रह्मामध्ये लय पावतो. हाच गणेशयोग आहे. 'हा आत्मा ब्रह्म आहे' ही श्रुति येथे प्रमाण आहे. 'तूंच प्रत्यक्ष तत्व आहेस' अथर्व श्रुति 'सर्वत्र अभेद आहे, जगत् जीव आणि ब्रह्म यांच्यामध्ये अभेद आहे' असे सिद्ध करते.

## सिद्धिबुद्धिस्वरूप वर्णन

(२) पुनः, अनेक प्रकारची भ्रांति उत्पन्न करणारी जी माया तिचे नांव सिद्धी आहे; आणि भ्रांतिचा नाश करणारी जी शक्ति त्या मायेचे नाव बुद्धि असे आहे. ह्या सिद्धिबुद्धीचा स्वामी श्रीगणेश स्वानंद नगरीमध्ये राहतो. तो शांतिमय आहे. त्याला सिद्धीपासून लक्ष व बुद्धीपासून लाभ असे दोन पुत्र आहेत.

## चित्तपंचक वर्णन

(३) चित्ताच्या पांच वृत्ति आहेत. त्यांची नावे क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र आणि निरोध अशी होत. हेच चित्तभूमिपंचक होय. (अ) संसारामध्ये व व्यवहारामध्ये चित्त रममाण झाले म्हणजे त्याला क्षिप्त असे म्हणावे. हे योगाच्या बिलकुल उपयोगी नाही; पण याचा चालक जो चिंतामणि तो योगोपयोगी आहे. (आ) भ्रमिष्ट लोक

ज्याच्यायोगाने पिशाच्चासारखे आचरण करतात, त्या चित्ताला मूढ असे ह्मणावे. याचाही उपयोग योगाभ्यासाला नाही, तथापि त्याच्या अंतर्यामी राहणारा चिंतामणि उपयोगी आहे. (इ) ज्याच्यायोगाने संसाराचा वीट आल्यामुळे दुःख होते. पण ब्रह्मानुभव आल्यावर मिळणारे जीवनमुक्ताचे सुख प्राप्त होत नाही, त्याला विक्षिप्तचित्त असे म्हणावे. याचाही योगाभ्यासाला उपयोग नाही. पण त्याच्या अंतर्यामी असणाऱ्या चिंतामणीचे मात्र ध्यान करावे. ( ई ) श्रुतीच्या अभ्यासाने 'अन्न हे ब्रह्म आहे' असे ज्या वितर्कांच्या अनुगत असणाऱ्या योगाने स्थूल ब्रह्माचे ज्ञान होते, तो योग संप्रज्ञात समाधीच्या साह्याने प्राप्त होतो. याला **वितर्कानुगत** योग म्हणावे. दुसरा **विचारानुगत** संप्रज्ञात योग आहे. ज्या श्रुतीच्या अभ्यासाने 'प्राण ब्रह्म आहे, मन ब्रह्म आहे, विज्ञान ब्रह्म आहे,' अशा विचाराने सूक्ष्म ब्रह्माचे ज्ञान कळते तो विचारानुगत (विचारानंतर उत्पन्न होणारा) संप्रज्ञात योग आहे. आनंदानुगत संप्रज्ञात योग हा तिसरा योग आहे याचा अनुभव सुषुप्तीमध्ये (गाढ निद्रेमध्ये) आनंदरूपाने येतो. याच्याही पलीकडे जी तुरीया अवस्था आहे, तिचा ज्ञाता जो अहंभाव (अहंभूति, स्वज्ञान) त्याच्या रूपाने ब्रह्म प्रकट होते. ह्या चार वितर्कानुगत, विचारानुगत, आनंदानुगत व अस्मितानुगत नामक ब्रह्मज्ञानाच्या चारी अवस्थांमध्ये चैतन्य स्वरूपाने राहणारा जो आत्मा तोच वर सांगितलेला चिंतामणि आहे. (उ) ह्या चारी अवस्थांमध्ये एकाग्र चित्त झालेले जे ज्ञान त्याच्या ठिकाणी पूर्ण अभेद उत्पन्न झाला म्हणजे त्याला चित्तनिरोध असे म्हणावे. ही अवस्था प्राप्त होऊन येथे स्थित असणाऱ्या चिंतामणीचें ज्ञान योगमार्गानें झाले म्हणजे मोठे कार्य होते. असो. 'ग' या अक्षराने सर्व पांची

ब्रह्मांचा संयोग प्रकट होतो व 'ण' या अक्षराने त्यांचा अयोग स्पष्ट होतो. या संयोगायोगांचा योग गणपति आहे; आम्ही चारही देव त्याचे केवळ दास आहोत. म्हणून मी गणपतीचे नित्य ध्यान करून त्याचे भजन, पूजन करत्ये. हे योग वर्णन ऐकून महाकाली-आदि देवींना अति आश्चर्य वाटले. त्यांनी पूज्यभावाने आदिशक्तीला नमस्कार केला; आणि तिला विचारले की, आम्ही 'कोणत्या रीतीने गणेशउपासना केली असतां, आमच्या अंतःकरणातील विषयेच्छा व बुभुक्षा, यांचा नाश होईल?'

## जलंधराची उत्पत्ति. शंकरद्वारा जलंधराचा नाश

आदिशक्ति म्हणाली, ऐकः एकदां पार्वतीची थट्टा करावी या हेतूने कैलासपति शंकराने राक्षसाचे स्वरूप धारण केले. राक्षस पाहून पार्वती घाबरली; पण शंकरदर्शनाला आलेल्या महेंद्राने तिला धीर दिला व त्या राक्षसावर आपले वज्र सोडले. शंकराने तो वज्र-प्रहार सहजासहजी निष्फल केला; आणि इंद्राला शिक्षा करण्यासाठी, आपल्या तिसऱ्या डोळ्यांतून अग्नि उत्पन्न केला. इतक्यात तेथे देव-गुरू बृहस्पति आले आणि त्याने सर्वांची गैरसमजूत नाहीशी केली पण शंकराने उत्पन्न केलेल्या अग्नीचे काय करावे हे कोणासही कांही सुचेना. शेवटी शंकराने त्याला सांगितले की, 'तुला मी समुद्रांत फेकून देतो. तेथे तुला असुरयोनि प्राप्त होईल. तूं जगद्विजयी होशील, पण तू धर्मलोप करशील. तुला कोणताही प्राणी मारू शकणार नाही. मुला! तुला वृंदा या नांवाची स्त्री मिळेल. ध्यानांत ठेव की, तिचे पातिव्रत्य नाहीसे झाले म्हणजे तुझा नाश मी करीन.' असे बोलून व त्या मुलास फेकून देऊन, शंकर ध्यानस्थ झाला.

याप्रमाणे शंकराने समुद्रांत फेकलेल्या अग्नीने जलंधर या नावाने आपणास प्रकट केले. त्याचे सर्व संस्कार समुद्राने मोठ्या प्रेमाने केले. पुढें जलंधराने ब्रह्मांड विजय करून वृन्देशी लग्न लावले. त्याच्या राज्यांत कर्मलोप व धर्मलोप पूर्ण झाला. विषयासक्त होऊन जलंधर उन्मत्तपणे कालक्रमणा करू लागला. पुढे एके दिवशी नारदाने पार्वतीच्या स्वरूपाचे वर्णन जलंधरापाशी केले. ते ऐकून पार्वती-प्राप्तीसाठी, जलंधराने कैलासावर स्वारी केली. या युद्धात देवांचा पराभव झाला व ते रानावनांत निघून गेले. तेथे त्यांनीं गणेशाचे आराधन सुरू केले. शंकर व विष्णु मात्र लढत होते. हे युद्ध चालले असतां विष्णुने जलंधराचे रूप धारण केले आणि वृन्देचे पातिव्रत्य हरण करण्याचा यत्न केला पण तो सिद्धीस गेला नाही. उलट, वृन्देने त्याला शाप दिला की, 'तुला दगडाची स्थिती प्राप्त होईल! म्हणून विष्णुही गणपतीचे आराधन करू लागला युद्धांत पराभव पावल्यावर शंकरही तेच करीत होता. प्रसन्न होऊन गणपतींनी शंकराला जलंधरवधासाठी सुदर्शन चक्र दिले व विष्णूला सांगितले की, 'वृन्देविषयीचा तुझा प्रयत्न आतां सिद्धीला जाईल. तू तिकडे जा. तुला तिच्या शापामुळे शालिग्राम रूप आल्यावर तुझी सर्व लोक भक्तिने पूजा करतील.' हे ऐकून शंकर व विष्णु हे स्वकार्याला निघाले. पुढे वृन्देचे पातिव्रत्य भ्रष्ट झाल्याबरोबर, शंकराने जलंधराचा वध केला इकडे, 'विष्णूने आपल्याला फसवून स्वसुखार्थ नीतीभ्रष्ट केले आणि आपल्या पतीचा वध करविला' हे समजल्यावर वृन्देने अग्निकाष्टे भक्षण केली. वृन्दा मेल्यामुळे विष्णूला अनावर वियोग-दुःख झाले. तेंव्हा देवांनी मध्यस्थी करून पुनः जिवंत झालेली वृन्दा व विष्णु यांचा विवाह घडवून आणला.

पुढे दोघेही आनंदाने कालक्रमणा करीत राहिली. शिळारूपी विष्णु व तुळसीरूपी वृन्दा यांचे लग्न प्रतिवर्षी कार्तिक शुद्ध द्वादशीला आपण सर्वजण अजूनपर्यंतही लावतो; त्याचे कारण हे असे आहे.

## कामासुर राक्षसाची उत्पत्ति • त्रिगुणात्मक चराचराची परंपरा • गणेशयोग

जेव्हां वृन्देचा विरह विष्णूला झाला होतां तेंव्हा दुःखातिशय होउन त्याचे वीर्य स्खलन झाले व त्यापासून एक राक्षस उत्पन्न झाला. त्याचे नाव कामासुर ठेवले. त्याने यजुर्वेदीय रुद्र मंत्रानी शंकराची उत्कृष्ट तपश्चर्या केली आणि शंकर प्रसन्न झाल्यावर 'विश्व-विजय व जीवाच्या हातून मृत्यूचा अभाव' हे वर मागून घेतले. पुढे कामासुराने राक्षसांची सेना तयार करून, जगद्‌विजयाला निघण्याच्या अगोदर आपणास राज्याभिषेक करून घेतला. नंतर पृथ्वीवर आपली सत्ता स्थापन करून, स्वर्गलोकी इंद्रादि देवांचा पराभव केला त्यांस त्याने स्थानभ्रष्ट केले. पाताळलोकीही कामासुराचे राज्य प्रस्थापित झाले. पुढे सत्य, वैकुंठ व कैलास या लोकांवर स्वाऱ्या करून ब्रह्मादि देवांस त्याने अरण्यात पाठविले. असा हा ब्रह्मांडविजय पूर्ण झाल्यावर, कामासुर विषयभोगामध्ये दंग होऊन गेला. त्याच्या राज्यात धर्मांचा लोप व अधर्मांचा विजय झाला. या प्रमाणे कर्मलोप झाल्यावर, देवांची योगक्षेमासबधाने तारांबळ झाली. 'आता पुढे काय करावे' ही चिंता देवास पडली. तेंव्हा तेथे मुद्गलनामक एक महा गणेशभक्त आला त्याने 'स्वानंदवासी गणपतीचे ध्यान करण्यास व एकाक्षरी मंत्राचा जप करून गणपतीचे आराधन करण्यास लागा' असा देवास उपदेश केला. देवांनी

दंडकारण्यांत जाऊन, मयूरेश नामक क्षेत्र आहे, तेथे तपश्चर्या करण्यास आरंभ केला. हे क्षेत्र प्रलयकालीसुद्धा नाहीसे होत नाही. प्रलयकाली या क्षेत्रात स्वानदवासी विघ्नेश्वर योगनिद्रा घेतात. गणपतीच्या निःश्वासापासून प्रकृतिपुरूषादि त्रिगुणात्मक नाना-तत्त्वांचा जन्म, विराटस्वरूप, पंचमहाभूतांची उत्पत्ति, जीवांची उत्पत्ती, नाभीपासून ब्रह्मदेवाची, मुखापासून विष्णूची, नेत्रापासून शंकराची, दक्षिण अंगापासून सूर्याची व माझी उत्पत्ति झाली, अशी सर्व त्रिगुणात्मक चराचराची परंपरा उत्पन्न झाली. आह्मी सगळ्यांनी ज्ञान मिळविण्यासाठी पुष्कळ वर्षे तपश्चर्या केली. तेंव्हा शेवटी आमच्या प्रत्येकाच्या हृदयात नर-गजरूपी आकृति प्रकट झाली. हा काय साक्षात्कार आहे, हे आह्मास समजेना. तेंव्हा आकाशवाणी झाली की, ‘ तुह्मी सर्वांनी भृशुंडीनामक भक्ताकडे जावे, त्याकडून गणेशयोगाची दीक्षा घ्यावी व नंतर ब्रह्मज्ञान समजून घ्यावे.’ मग आह्मी भृशुंडीला शरण गेलो; आणि त्यापासून गणेशयोगाचे व गणेशब्रह्माचे ज्ञान करून घेतले. आह्मास त्याने पुष्कळच गोष्टी सांगितल्या. त्यात भक्तांच्या संरक्षणासाठी भक्तवत्सल गणपति देहधारी होतो, हे वृत्त ऐकून आह्मास फार संतोष झाला. कारण कामासुराचा वध होऊन आम्ही आमच्या स्वस्थानी जाऊं अशी श्रद्धा आमच्या अंतःकरणात उत्पन्न झाली. भृशुंडीने आह्मास सांगितले की, गणपतीची तिन्ही लोकांत तीन स्थाने आहेत, स्वर्गात कैलास, पाताळात शेषमंदिर आणि पृथ्वीवर मयूरपुरी, ही मुख्य गणेशक्षेत्रे आहेत. प्रकृति ( जडजगत ) व आत्मानामक पुरुष या दोघांचा संयोग ज्यामध्ये होतो तेथे स्वानंदवासी गणेश रहातो. त्याचे ज्ञान केवळ गणेशयोगानेच स्वतःला प्रकट ज्ञात होते.

## क्षेत्राच्या द्वारांचे वर्णन

आता क्षेत्रांची द्वारे सांगतो:- या क्षेत्राच्या पश्चिमअंगापासून शक्तिरूपी 'असत् ब्रह्म' उत्पन्न झाले. तेच रति आणि काम (भोग्य अणि भोक्ता) याच्या ऐक्याचे स्थान असणारे, पहिले द्वार होय. भोग्य आणि भोक्ता यांचे मोहशून्य (शास्त्रीय पद्धतीने) ज्ञान प्राप्त झाले असतां 'असत्' ब्रह्माची ओळख व प्राप्ति होते. या द्वाराने आंत शिरल्यावर उत्तरांग द्वाराचा लाभ योगी करून घेतात. या उत्तरांगापासून 'सत्' वाचक सौर ब्रह्म उत्पन्न झाले आहे. हे ज्ञान आणि कर्म, या रूपाने प्रकट होते. ह्या सर्व जगताला कर्मांचा आधार आहे, व कर्मानेच या सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय ही कार्ये होतात. कर्मरूपा (संज्ञा) ही सूर्याची भार्या आहे. ही आसक्ति उत्पन्न करणारी आहे पण ज्ञान हे या 'सत्' ब्रह्माचे दुसरे अंग आहे. हे ज्ञान वराहरूपी असून कर्मांशी संग मुळीच ठेवत नाही. तथापि ह्या ज्ञानात अभिमानाचा पुष्कळ अंश असतो म्हणून साधकाने कर्मांपासून व ज्ञानापासून उत्पन्न होणारा जो मोह याचा त्याग करून ज्ञान व कर्म यांची ऐक्यता करावी म्हणजे सद्रूप रविवाचक ब्रह्माला प्रसन्न करून घेऊन त्याची प्राप्ति करून घ्यावी, हे दुसरे द्वार होय. याला उत्तरांग द्वार म्हणतात. हे द्वार प्राप्त करून घेऊन ते ओलांडून गेल्यानंतर पूर्वांगापासून निघालेला आनंदमय (पूर्ण आणि समभाग प्रकाशक) असा जो विष्णु त्याचे दर्शन होते. हे वैष्णव ब्रह्म समरूपाने सत्य, असत्य, या सत्यासत्यात्मक (सत् ब्रह्म व असत् ब्रह्म यांच्या) योगाचे ठायीं राहते. हे दोन प्रकारचे असते. लक्ष्मीमय शोभात्मिकारूप व यशोरूप, हे ते प्रकार होत. शोभेने मोहित झालेले असत् ब्रह्म व त्या असत् ब्रह्माचा आधार जे सत् ब्रह्म ही

स्वशोभेने जीवास मोह घालतात. जेथे लक्ष्मी तेथेच यशाही राहते. या लक्ष्मीचा चालक जो विष्णु तो साम्यावस्था उत्पन्न करतो. तो आनंदभोक्ता व सद् असदाचा संयोग करणारा आहे. त्यालाच वैष्णव ब्रह्म असे म्हणतात. हे आनंददायकद्वार गणपतीच्या पूर्वांगाला आहे. या द्वाराची प्राप्ति करून घेऊन मुमुक्ष (मोक्ष मार्गाचा मार्ग) पुढे चालूं लागला म्हणजे दक्षिण अंगातून निघालेले 'अव्यक्त' नामक श्रेष्ठ नेतिरूपक, जे शैव ब्रह्म ते दृग्गोचर होते. 'सत्, असत् व सदसत् ही तिन्हींही ब्रह्में मुख्य ब्रह्माचे स्वरूप नाहींत' असे प्रतिपादन करणारे हे 'अव्यक्तरूप' शांकर ब्रह्म आहे. हेही माया संसर्गाने दोन प्रकारचे होते. (१) पार्वती नामक महामाया आणि (२) मोहशून्य शंकर ही ती दोन रूपें होत. या दोघांचा संयोग करणे (मोहरूपी माया व मोहशून्य शंकर या दोघांचा संयोग करून भेदनाश करणे) याला महेशान (शांकर) ब्रह्म म्हणतात. हे अव्यक्त स्वरूपाचे असून दक्षिण द्वाराचे अधिष्ठातृ आहे या द्वाराचाही अधिगम करुन मोक्षार्थी मार्ग पुढे गेला म्हणजे मागे सांगितलेल्या चारी ब्रह्माचा (असत रूपशक्तिब्रह्म, सद्रूप सौरब्रह्म, सद असत साम्यभावस्वरूप वैष्णव ब्रह्म व सद्-असत भेदाभाव-रूप शांकर ब्रह्म या सर्वांचा) भेदनाश करून मग एकरूपाने संयोग उत्पन्न करणे हा स्वानद ब्रह्माचा स्वभाव आहे. हे ब्रह्म स्वसंवेद्य आहे; व या सर्वश्रेष्ठ ब्रह्माचे ज्ञानविज्ञान गणेश-योगाने मात्र होते. हेच गणपतीचे चतुर्द्वायुक्त व सर्व सिद्धि देणारे स्वानंद नावाचे ब्रह्म आहे.

सूत :- शौनका ! पूर्व द्वारावर राहणारे लक्ष्मीनारायण यांनी आपल्याला राहण्यासाठी अनेक क्षेत्रे गणेशसाक्षित्वाने उत्पन्न केली

आहेत. याचप्रमाणे दक्षिण द्वारस्थ शक्तिशिवांनी, पश्चिम द्वारस्थ रतिकामांनी, उत्तर द्वारस्थ महीवराहांनी आपापल्या संप्रदायांसाठी गणेशसाक्षित्वाने व गणेशाच्या अनुज्ञेने पुष्कळ क्षेत्रे निर्माण केली आहेत. ही क्षेत्रे धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे पुरुषार्थ गणेशानुज्ञेने सिद्ध करतात. यांतील कांही क्षेत्रे तात्काळ फळ देतात व कांही क्रम योगाने पुरूषार्थ साध्य करून देतात गणपतीच्या मयूरक्षेत्रामध्ये सर्व सिद्धिदाता गणपति हा शुंडाधर, चतुर्भुज, लबोदर, विशालाक्ष, त्रिनेत्र, पाशांकुशधर, नाभिशेष ( नाभीच्या ठिकाणी शेषनाग आहे ज्याच्या तो ), शूर्पकर्ण. हा असा आपल्या तेजस्वी ऐश्वर्यांने स्थित आहे. याच्या डाव्या अंगाला सिद्धि दोन्ही हातानी चवरी घेऊन गणपतीची सेवा करते उजव्या अंगाला ज्ञानरूपी बुद्धि सुगंधि वस्तु परमेश्वराला अर्पण करीत असते. गणपतीच्या समोर मूषक व मयूर उभे असतात. पाठीमागे प्रमोद, मोदकादि गण असतात. हे गणपतीचे सांगोपांग स्वरूप मुख्य आहे. पूर्वद्वारावरील लक्ष्मीनारायण हे गणेशाचे मानस पुत्र आहेत. यांचे ज्ञान करून घेऊन गणेश-ब्रह्माप्रमाणेच यांचीही पूजा करावी.

## द्वारयात्रा व त्यापासून प्राप्ती

भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून द्वारयात्रेला आरंभ होतो. पहिल्या दिवशी पूर्वद्वार यात्रा करावीं. येथे लक्ष्मीनारायण राहतात. यांच्या पूजनाने धर्मनामक पुरुषार्थ साध्य होतो. दुसऱ्या दिवशी दक्षिण-द्वारयात्रा करावी. येथे पार्वतीशंकर हे गणेशाचे मानसपुत्र राहतात. यांच्या पूजनाने सर्व अर्थ साध्य होतात. तिसऱ्या दिवशी पश्चिमयात्रा करावी. तेथे रति आणि काम हे गणेशमानसपुत्र राहतात. यांची पूजा केली असता काम नामक पुरुषार्थ सिद्ध होतो. चवथ्या दिवशी

म्हणजे चतुर्थीला उत्तरद्वारावर महीवराह नामक ( पृथ्वी व सूर्य ) मानस पुत्र राहतात. त्यांचीही पूजा विधिपूर्वक करावी. या पूजेने मोक्षनामक पुरुषार्थ साध्य होतो. ह्या चारही दिवस उपोषण करावें. माघ शुक्ल पक्षांत किंवा जमल्यास, प्रत्येक महिन्याच्या शुक्ल पक्षात द्वारयात्रा करावी. किंवा इष्ट वाटतील त्या चार दिवस द्वारयात्रा करावी. अगदीच सामर्थ्य नसेल तर स्वतः अथवा ब्राह्मणाद्वारा एक दिवस तरी ही द्वारयात्रा करावी. येथे हे ध्यानात ठेवले पाहिजे की, धर्म हा सर्व सिद्धि देणारा पुरुषार्थ आहे. अर्थ हा पुरुषार्थ सामर्थ्य देतो. काम नामक पुरुषार्थ सौख्य देतो आणि मुक्ति अत्यंत आनंदावाप्ति देते व दुःखाचा नाश करते. धर्म नामक पुरुषार्थ समान स्थिति उत्पन्न करणाऱ्या विष्णूच्या स्वाधीन आहे. धर्म असेल तरच पुढचे सर्व पुरषार्थ साध्य होतील. अर्थ हा पुरुषार्थ सर्व सामर्थ्य देणाऱ्या शास्त्रप्रसिद्ध शंकराचे स्वाधीन आहे. धर्मनिष्ठेने उत्पन्न झालेले सामर्थ्य कांही विलक्षण असते. काम नामक पुरषार्थ मदनाचे स्वाधीन आहे. धर्मनिष्ठ पुरुषाला सामर्थ्य प्राप्त झाल्यानंतर तो दुसऱ्यास दुःख न देतां आपल्यास सुख देणाऱ्या सात्विक विषयांचा मात्र योग्य भोग घेतो. मोक्षनामक पुरुषार्थ शुक्ल गतीनें ( देवयानमार्गाने ) प्राप्त होतो. शुक्लगतीचे आधिपत्य सूर्याकडे आहे, म्हणून मोक्षाचा अधिपति जो आत्मा तो सूर्यरूप आहे. धर्मनिष्ठ पुरुष समर्थ होऊन मग आपल्या सात्विक इच्छा परिपूर्ण करतो व नंतर तृष्णाशून्य होतो. तृष्णाशून्य झाल्यावर ज्ञान होते, व मुक्ति मिळते. अशी या द्वारांच्या अधिपतींची व्यवस्था आहे. हे मयूरक्षेत्र प्रलय झाला तरी नाशहीन ( अक्षर ) स्वरूपाने राहते, हे मागे तुह्मांस सांगितलेंच आहे. या क्षेत्रांत सर्व देव, सर्व देवता, सर्व मुनि, सर्व सिद्ध, सर्व क्षेत्रे सर्व

पर्वे यांची वसति असते; ह्मणून या क्षेत्रांत साधकाचे नित्य वास्तव्य झाले तर निदान कांही दिवस, किमानपक्ष एक दिवस तरी वास्तव्य झाले तर, व द्वारयात्रापूर्वक गणेशपूजन विधिपूर्वक झाले तर, साधकाच्या सर्व मांगलिक इच्छा तृप्त होतात, इतकेच नव्हे तर अतिपापी पुरुषाने नकळत या क्षेत्रांत येऊन एक द्वारयात्रा जरी सिद्ध केली, तरी त्याच्या सर्व पापांचा नाश होऊन तो ज्ञानमार्गाला लागतो. या क्षेत्रांत कोणत्याही शहाण्या पुरुषाने कोणत्याही प्रकारचे निषिद्ध आचरण करू नये. कारण येथे केलेल्या पापाला नष्ट करणारे व पाप्याला प्रायश्चित देणारे दुसरे क्षेत्र नाही, किंवा दुसरा मार्गही नाही.

## मयूरक्षेत्र व दंडकारण्य ही नांवे पडण्याची कारणे

सूत :– श्रोतेहो! या क्षेत्राला मयूरक्षेत्र असे नांव पडण्याचे कारण इतकेच आहे की, येथे गणेशमूर्ति प्रकट झाली ती मयूरारूढ होऊन प्रकट झाली. मयूरक्षेत्र ज्यांत आहे अशा या अरण्याला दंडकारण्य हे नांव पडण्याचे कारण असे आहे की, येथे दंडाच्या ह्मणजे कर्मविपाकाचा अरण्य ह्मणजे अभाव असतो. कारण येथे गणेशब्रह्माची वसति आहे. दंडाचा अभाव येथे ह्मणून याला दंडकारण्य म्हणातत. या अरण्याने मूर्त स्वरूप घेऊन गणेशाची पूजा केली ह्मणून गणपतीने येथे या अरण्यात राहण्याचे आश्वासन दिले. म्हणून येथे गणेशब्रम्हाची नित्य वसति आहे.

## मयूरक्षेत्री उपासना केलेल्यांचे अनुभव चार द्वारांची यात्रा व फलश्रुति

**सूत :–** एकदा एका अरण्यात एका ब्राम्हणाच्या बायकोला कांही दुष्ट लोकांनी अडविले असता, आपल्याला त्यांच्या हातून सुटण्याचा कांही उपाय नाही असे पाहून, त्या दुष्टांस ती दुर्दैवी स्त्री म्हणाली की, 'आजपासून पांच दिवसांनी मी तुमची इच्छा परिपूर्ण करीन. आता मला जाऊं द्या.' ह्याप्रमाणे वचन देऊन ती त्यावेळी सुटून आली. मग तेथून ती रडत रडत मयूरेशक्षेत्राला गेली. तेथे गणेशतिर्थात स्नान करून व गणपतीची पूजा करून, पूर्वद्वारावरील शक्ति देवीची तिने पूजा केली. नंतर पुनः मयूरेशाची तिने अर्चा केली आणि गणेशस्मरण करींत पांचव्या दिवशी घरीं गेली. कारण तिने त्या दुष्टास वचन दिले होते. ते लोक पांचव्या दिवशी येतात न येतात तो ते अग्नीने जळून खाक झाले! नंतर तिची गणपतीवर दृढ निष्ठा बसली आणि शेवटीं ती पतिव्रता आपल्या पतीबरोबर स्वानंदवासी झाली. याचप्रमाणे मद्र देशाच्या राजाला त्याच्या शत्रूंनी अत्यंत पीडा दिली, तेंव्हा त्याने मयूरक्षेत्री दक्षिणद्वाराची यात्रा भक्तिपूर्वक केली आणि स्वनगरीत जाऊन सर्वसंकटमुक्त झाला. तशीच पश्चिमद्वाराची यात्रा केल्यावर एक वैश्य संकटविमुक्त झाला व एक शूद्र उत्तरद्वाराची यात्रा करून मोक्ष मिळविता झाला. चार द्वारांची यात्रा करून एक अत्यंजही मुक्त झाला! या क्षेत्रांत भैरवदर्शनाने अंगात संचार करीत असलेली भुते निघून जाणे, नीलकंठदर्शनाने विविधबाधा नाहीशी

होणे, कृत्तिवासाच्या ( सांबाच्या ) दर्शनाने राक्षसांचा संहार करता येणे आणि रोग नाहीसे होणे इत्यादि अनेक संकटांचा नाश मयूरेश-कृपेने व त्याच्या अनुग्रहाने तेथे राहणाऱ्या देवांच्या दर्शनाने होतो. याचप्रमाणे गर्भागाराच्या ( गाभाऱ्याच्या ) चारी द्वारांची यात्रा सिद्ध झाली असता, बुद्धिप्राप्ति, पापविमोचन, गेलेली संपत्ति पुनः मिळणे सहज व लीलेने साध्य होतात.

## मयूरक्षेत्र माहात्म्य वर्णन

**सूत** :– भृशुंडी मुनींने देवास सांगितले :- जे लोक सकाम भक्ति करतात त्यांना गणेशाच्या स्वानंदनगरीत जाता येत नाही. पुण्य-संचय पुष्कळच केला असेल, तर सकामभक्तास कैलास, वैकुंठादि लोक मिळतात; पण पुण्यसंचय संपला ह्मणजे त्यास पुनः कर्मभूमीवर यावे लागते.

**सूत** :– या मयूरक्षेत्राच्या बाहेर चारी दिशांस जी भूमि आहे, तिला देवभूमि असे ह्मणतात. त्या भूमिचासुद्धा इतका पुण्यप्रभाव आहे की, तेथे कितीही मोठा पापी पुरूष गेला आणि दैवयोगाने मरण पावला, तर तो सर्वपापविमुक्त होतो; इतकेच काय, पशुपक्षीसुद्धा जर या भूमीत पंचत्व पावले, तर पुढच्या जन्मी श्रेष्ठ मनुष्यकुलांत जन्म पावून गणेशभक्त होतात आणि अती मुक्त होतात. या क्षेत्रात सिद्धि, बुद्धि, सरस्वति, लक्ष, लाभ, भ्रामरी इत्यादि देवता, तसेच मयूर, मूषक प्रमोदादि गण, तसेच पूर्व दिशेला धर्मप्रवर्तक विष्णु. दक्षिण दिशेला अर्थ देणारा शंकर, पश्चिम दिशेला कामना पूर्ण करणारी शक्ति,

उत्तरेला मुक्ति देणारा सूर्य, हे चार मुख्य देव व मुद्गलशुकादि महाभक्त, हे गणेशसेवनामध्ये एकनिष्ठपणाने रममाण होऊन गेले आहेत, अष्टविनायक, अष्टमाता, शुक्ल व कृष्णचतुर्थी, शमी मंदार, दूर्वा व सर्व दिक्पाल हेही मयूरेशसेवेमध्ये आपल्यास धन्य मानून घेत आहेत. विदर्भातील वक्रतुंड, पेली नगरस्थ बल्लाळ, विद्यापुरस्थ हेरंब, पारिनेरस्थ विघ्नेश, गंगातटस्थ भालचंद्र, स्थावरक्षेत्रस्थ चिंतामणि, सिद्धिक्षेत्रस्थ सिद्धिविनायक, मणिपुरक्षेत्रांतील महागणपति, याचप्रमाणे सर्व आर्यावर्तातील गणपति, या मयूरेशक्षेत्राच्या गर्भागारांत राहून, भक्तांचे इष्टकाम पूर्ण करीत असतात. तसेंच, देवागारांतही ( देवघरांतही ) सर्व देव आपापल्या क्षेत्रांसहवर्तमान येथे रहात असतात. याचप्रमाणे राम, लक्ष्मण, व्यास, नरहरि, वामन, मत्स्य, बुद्ध, हयग्रीव, कूर्म, परशुराम, कपिल, नारद, कार्तवीर्य, ऋषभ इत्यादि अनंतदेव व अनंतभक्त गणेशाची पूजा करीत असतात हे सर्व पुण्य पुरुष आहेत, म्हणून सामान्य भक्तांनी यांचीही पूजा करावी. या क्षेत्रांत जी गणेशकुंडे आहेत, तेथे भारतवर्षांतील सर्व नद्या आपल्या मुख्य स्वरूपाने राहतात. चंद्रासह सर्व ग्रह व नक्षत्रें वासुकीप्रमुखनाग हेही येथे वस्ती करून राहिले आहेत. ग्रहांची पूजा त्या त्या ग्रहाच्या वारी ( दिवशी ), पौर्णिमेला राहू, अमावस्येला केतु, अष्टमीला भैरव ( भूतप्रेताचा नाश करणारा ), दशमीला चोरादिकांचे भय नाहीसे करणारे दशदिक्पाल, पंचमीला सर्व व्याधि, आणि संकटांचा नाश करणारे नाग, एकादशीला द्रव्य देणारा कुबेर, त्रयोदशीला धर्मवृद्धि करणारा यमधर्म ह्यांची पूजा विहित आहे. असो; असे येथे अनंतदेव, अनंतऋषि, अनंतभुवनातील अनंत सिद्ध, अष्टवसु, एकादशरुद्र व द्वादशमित्र

हे गणेशअर्चा करीत असतात. त्यांचे वर्णन किती करावे. सर्व क्षेत्र देवदेवींच्या विभूतींनी तन्मय झाले आहे; म्हणून येथे राहणाऱ्या पुरुषांनी कोणत्याही प्रकारचे पातक करता उपयोगी नाही. एका ब्राह्मणाने यःकिंचित् अगदी लहान पाप येथे केले होते तर त्याला क्षेत्रस्थ भैरवांनी शंभर वर्षेपर्यंत अग्निचक्रांत जळत ठेवला होता! अन्यक्षेत्रांमध्ये केलेले पाप मयूरक्षेत्रामध्ये नाहीसे होते; पण या क्षेत्रांत केलेले पाप नाहीसे करण्याला साधन नाही.

## धर्मध्वज वैश्याची गोष्ट

सूत :– पूर्वी धर्मध्वज या नावाचा एक धनलोभी वैश्य होता. त्याने द्रव्यलोभाने आपल्या बापासही विष घालून मारले होते! तो एकदां यदृच्छेने मयूरक्षेत्री आला. क्षेत्रभूमीत त्याने प्रवेश केला, तेंव्हा त्याच्या पापांस त्याचे शरीर सोडून क्षेत्राबाहेरच रहावे लागले. ती पापें हा वैश्य बाहेर येण्याची वाट पहात होती. पण दैवयोग असा विचित्र की, मयूरक्षेत्रात असतांना या वैश्याने कोणत्याही तऱ्हेचे पातक केले नाही व गणेशयात्रा पूर्ण करून तो बाहेर गेला, तेंव्हा त्याची वाट पहात असलेल्या पापांस त्याला स्पर्श करता येईना. त्यांनी विचार केला की, याला थोडेसे विघ्न उत्पन्न केले म्हणजे हा लहान पाप करील आणि मग आपण याच्या शरीरामध्ये प्रवेश करू. या वैश्याने काही मार्ग आक्रमण केल्यानंतर त्याला चोरांनी गाठून त्याचे द्रव्य हिरावून नेले. द्रव्य गेलेले पाहून त्या वैश्याला पाप करण्याची बुद्धि उत्पन्न झाली. पण त्याच्या सुदैवाने त्याला एका ब्राह्मणाची गाठ पडली. ब्राह्मणाने त्याला सांगितले की, तुझी पूर्व पापे तुला पुनः पापमार्गात ढकलणार आहेत तेंव्हा आपल्या

बायकामुलांस घेऊन तूं मयूरेशपुरीला जा म्हणजे तू दुःखशून्य होशील. वैश्यास हा उपदेश चांगला वाटून त्याने त्याप्रमाणे केले.. तेंव्हांही क्षेत्राबाहेर त्याची वाट पाहत असलेली पापे भोक्त्याच्या अभावाने नाहीशी झाली आणि तो वैश्य दुःखमुक्त झाला, एवढेच नाहीतर अंती तो ब्रह्मभूत झाला.

## धर्मनिष्ठ व देवप्रिय ब्राह्मणाची कथा

सूत : – अंगिरसकुलांत धर्मनिष्ठ असा देवप्रिय या नांवाचा एक गणपतिभक्त मोक्ष मिळावा या हेतूने सर्व कर्मे विधिपूर्वक करीत असे. निष्काम कर्माचरणाने चित्तशुद्धि होते यासाठी ब्रह्मज्ञानाचे श्रवण करण्याला प्रारंभ करण्यापूर्वी चित्तशुद्धि होण्याकरतां साधकाने निष्काम कर्म करावे. असो; हा देवप्रिय ब्राह्मण चित्तशुद्धीप्रीत्यर्थ यात्रा करण्यास निघाला. त्याने अनेक यात्रा केल्या. एक मयूर क्षेत्राची मात्र त्याची यात्रा राहिली होती तीही पूर्ण करण्याचा त्याने संकल्प केला; पण दैवयोगे त्याचवेळी त्याचे द्रव्य चोरांनी लुटून नेले; तथापि त्याने आपला संकल्प सोडला नाही. भिक्षावृत्ति पत्करून यात्रा संपादन करण्याचा त्याने निश्चय केला. तरी दुर्दैवाने त्याची पाठ सोडली नाही. तो तापाने आजारी झाला. तथापि संकल्पाला एकनिष्ठ राहून अंगात ताप असताही भिक्षा मागत मागत मयूरक्षेत्री हा द्विज आला. हा ब्राह्मण आपल्या संकल्पापासून ढळत नाही असे पाहून विघ्नेशांनी त्याचा ताप नाहीसा केला व त्याला पुष्कळ द्रव्य दिले. हे सर्व देवाचे करणे आहे असे समजून तो भक्तिने आपली क्षेत्रयात्रा संपादिता झाला आणि गणेशभजन अखंड ठेवल्यामुळे स्वानंदवासी झाला.

# सुलभ नावाच्या क्षत्रीयाची कथा गणेशाच्या एकाक्षरी तारक मंत्राचे वर्णन

आणखी एक गोष्ट सांगतो, ऐका: कोणे एकेकाळी सुलभ या नावाचा क्षत्रिय अंगदेशावर राज्य करीत होता. त्याला कोणी एकदा मयूरक्षेत्राचे माहात्म्य सांगितले, तेंव्हा ती यात्रा करण्याचा त्याने निश्चय केला आणि तो यथाशास्त्र पारही पाडला. पुढे दर वर्षास तो या क्षेत्राची वारी करीत असे. पुढे कांही काळानंतर त्याला अशी बुद्धि उत्पन्न झाली की, खरोखर पाहता सर्व क्षेत्रास काशीक्षेत्र हे मुख्य आहे. ते शंकराचे क्षेत्र आहे. अर्थातच हे कमी योग्यतेचे असले पाहिजे. असा विचार करून त्याने मयूरक्षेत्राच्या वारीचा नियम सोडून दिला व काशीयात्रेला निघाला. दैवयोगाने रोग उत्पन्न होऊन वाटेतच त्याचा अंत झाला; पण पूर्वपुण्य मोठे होते ह्मणून त्याला काशीक्षेत्रातच ब्राह्मणाचा जन्म प्राप्त झाला. या जन्मांतही त्याने पुण्यसंचय मात्र केला. शेवटी ह्मणजे अंतःकाळी विश्वेश्वराने त्याला गणेशविषयक एकाक्षरी तारक मंत्राचा उपदेश केला. भूदेवहो! हा तारकमंत्र कसा आहे तें तुम्हास सांगतो, महद्ब्रह्म ह्मणजे ब्रह्मदेव याचे स्वरूप बिंदुमात्र आहे. तो ब्रह्मदेव 'ग' या अक्षरामध्ये 'ग्' हे जे व्यजन आहे तत्स्वरुप आहे. सर्वप्रवर्तक विष्णु हा ब्रह्मदेवाचा पालक 'अ' या आकाराने 'ग' या अक्षरात राहतो. या दोघांचाही संहारकर्ता जो शंकर तो अनुस्वार रूपाने या मंत्रात स्थित झाला आहे. या सर्वांच्या आत्म्यात असणारा सूर्य अनुनासिक रूपाने ह्या मंत्रात वास्तव्य करतो आणि या चौघांस देहरूप करणारी जी शक्ति तो ॐकार स्वरूपाने 'गं' या मंत्राक्षराच्या आधी असते.

या सर्वांचा जो एक भाव, एक सत्ता, त्याला वेदामध्ये गणेश असे ह्मणतात. ह्या ' ॐ गं ' तारक मंत्रापासून इतर सर्व मंत्राची उत्पत्ति आहे. ह्या मंत्राची दीक्षा स्वतः शंकर काशीत राहणाऱ्या पुण्यवान पुरुषास देतो. मुनिहो ! हा तारक मंत्र ब्रह्मभूयत्व प्राप्त करून देतो. मुनिहो ! मनुष्याला काशीत मरण प्राप्त झाले तरी सर्वांसच मुक्ति मिळते असा भाग नाही. नेहमी उत्तम, मध्यम, अधम आणि अधमाधम अशा प्रतीचे लोक प्रत्येक शिष्यसंप्रदायात असतात. ( १ ) यांत विषयासक्त, पापी, केवळ विषयोपभोगाकरता कर्म करणारे, जे शिष्य असतात, त्यांना अधमाधम ह्मणतात. त्यांना अर्थातच त्यांच्या कर्माचे फल ह्मणजे सुख फारच थोडे मिळते; पण हेच पाहून त्या लोकांची पुण्यकर्म प्रवृत्तिच नाहीशी होते ! ही पुण्य कर्मप्रवृत्ती जिवंत रहावी ह्मणून ( स्वरूप ) पुण्यात्मक कर्मांचे फळ एकच प्रकारचे ह्मणजे मुक्तिरूप असते असे करुणाघन शास्त्र सांगते. शास्त्राचा हेतु हा की, मोक्षासारखे फल मिळत आहे ह्मणून तरी सामान्य लोकांची प्रवृत्ति पुण्यमार्गाकडे वळावी. ( २ ) समाजलज्जेस्तव किंवा राजदंडाच्या भयासाठी मात्र जे लोक सत्कर्म करतात त्यांना अधम ह्मणतात, पण त्यास अधमाधमापेक्षा सत्कर्माचे जास्त फल मिळते. ( ४ ) सकाम बुद्धीने पुण्य कर्म करणारे लोकास मध्यम शिष्य ह्मणतात, त्यांच्या कर्माप्रमाणे त्यास फळ मिळते. निष्काम बुद्धीने सत्कर्म करणारे लोक उत्तम शिष्य होत. त्यांना शेवटी मोक्षप्राप्तिच होते. कृतयुगांत केलेल्या कर्माचे फल तत्काल मिळते. त्रेतायुगांत ( अन्य कर्म बाधक नसेल तर ) कांही कालाने कर्मफल मिळते. द्वापरामध्ये पूर्व कर्माने प्रस्तुत कर्माचा बाध होत नसेल तर ह्या लोकी किंवा

परलोकी सत्कर्मांचे फल काही काळाने मिळते. कलियुगांत परलोका-मध्ये किंवा अन्यजन्मामध्ये केलेल्या कर्मांचे समग्र फल मिळत असते. म्हणून लोकांच्या अंतःकरणांत रुचि उत्पन्न व्हावी यासाठी विचित्र फलांची योजना केलेली असते. कृतयुगामध्ये जितके कर्म तितके फल मिळते. त्रेतामध्ये दुप्पट. द्वापारामध्ये तिप्पट व कलीमध्ये चौपट फलप्राप्ति होते. ध्यानांत ठेवा की, ज्याला आत्म्याचा अनुभव प्राप्त झाला नाही, त्याला कधीही मोक्षप्राप्ति व्हावयाची नाही. जसे सगळे अमर असलेले देव ब्रह्मदेवाचा दिवस संपला म्हणजे मृत्युयुक्त होतात तरी पण मनुष्यांच्या दृष्टीने अमरच असतात; तसेच शास्त्रांत जे पाच देव ईश्वर सांगितले आहेत ते त्रिगुणयुक्त असल्यामुळे त्यांचाही अंत महा-प्रलयाच्या वेळी होतो! अर्थातच त्यांनी दिलेली मुक्तिही तशीच असावयाची! मुक्ति जर हवी असेल तर एक स्वानंद देणाऱ्या गणपतीची प्राप्ति करून घेण्यासाठी तारक मंत्राची दीक्षा घेतली पाहिजे. तारक मंत्राचे ज्ञान झाल्यावर आपल्या अंतःकरणात योग-बुद्धि उत्पन्न होते, योगाने शांति मिळते आणि अंती तो पुरुष मोक्षाला जातो. असो, असा हा तारक मंत्र शंकराने काशीक्षेत्रात मेलेल्या त्या ब्राह्मणाला अंतकाळी दिला. त्या पुण्याने तो कैलास लीन झाला तेंव्हा हा ब्राह्मण मयूरक्षेत्रांत जन्मास आला. तेथे त्याने अखंड भक्ति केली, त्याने पुष्कळ संकटे आली तरी मयूरक्षेत्र सोडले नाही. क्षेत्र न सोडणे याला क्षेत्रसंन्यास म्हणतात. हा त्याचा क्षेत्रसन्यास व मयूरेशभक्ति पाहून गणपति प्रसन्न झाले आणि त्याला त्यांनी स्वानंदसुखाचा लाभ दिला.

# मयूरेश क्षेत्र माहात्म्य व तेथे उपासना करणाऱ्यांचे अनुभव

सूत :– द्विजहो ! हे मयूरेश क्षेत्र ब्रह्ममय आहे. ज्याप्रमाणे सर्व विश्व पंचविध ( पांच प्रकारचे ) आहे. त्याप्रमाणे, या क्षेत्रांत पाच तीर्थें उत्पन्न झाली आहेत. गणेशकुंड, ब्रह्मकमंडलूंतून उत्पन्न झालेली तुरीया, भागीरथी, सरस्वतीं व यमुना हींही पांच तीर्थें आहेत. पहिल्या दर्शनाने, मुक्ती व भुक्ति ( भोग ) देणारे, दुसरे स्नानाने मुक्ति देणारे, तिसरे स्नान करून स्वर्गसुख देणारे, चवथे तीन दिवस स्नान केल्यानंतर स्वर्ग सुख देणारे, अशी ही पाच भिन्न फले देणारी तीर्थें आहेत. असो; एकदां गणपतीच्या दर्शनाकरता आलेला ब्रह्मदेव महाकुंडांत स्नान करून गणपतींचे स्तोत्र म्हणू लागला. स्तोत्र समाप्त झाल्यावर गणपतीची त्याने आनंदाने पूजा केली, पण प्रदक्षिणा घालतांना त्याचा एका कमंडलूला पाय लागला. ती नदी पुनः कमंडलूमध्ये भरून ब्रह्मदेव घेऊन चालला, तेंव्हा गणपतीनी सांगितले, ‘ माझ्या प्रभावाने ही नदी उत्पन्न झाली आहे. ही नदी येथेच राहूं दे. त्यांतील एक कमंडलुभर पाणी घेऊन तूं जा.’ यावरून तेथे गणेशाच्या प्रसादाने ही नदी उत्पन्न झाली आहे हे कळते. ब्रह्मदेवाने त्याप्रमाणे केले व निघून गेला. तुम्हाला ठाऊकच आहे की, एकदा ब्रह्मदेवाने आपली कन्या जी सरस्वती तिच्याकडे वाईट दृष्टीने पाहिले. तेंव्हा सरस्वतीने गणेशाचे स्मरण केल्यामुळे ब्रह्मदेवाच्या बुद्धीत धर्मांचा प्रकाश पडला. त्याला पश्चात्ताप झाला आणि आपल्यास भ्रष्ट मार्गाने जाण्याची प्रेरणा करणारा जो काम त्याला ‘ शंकर तुला अग्नीमध्ये जाळून टाकील.’ असा ब्रह्मदेवाने शाप दिला. पुढे आपल्यास शुद्ध करून घ्यावे म्हणून

ब्रह्मदेवाने प्रमुख देव आणि प्रमुख ऋषी यांस बोलाविले व त्यांस सर्व हकीकत सांगितली. नंतर सर्वांनी मिळून साडेतीन कोटी क्षेत्रे उत्पन्न केली ! या प्रत्येक क्षेत्रांत ब्रह्मदेवाने स्नान केले, परंतु ब्रह्मदेव शुद्ध झाला नाही. याच कार्यासाठी सूर्याने स्वदेहापासून यमुनेला, आदिमायेने सरस्वतीला, शंकराने नर्मदेला व विष्णूने भागीरथीला निर्माण केले. या प्रत्येक नदीत ब्रह्मदेवाने स्नान केले, परंतु ब्रह्मदेव कांही शुध्द झाला नाही. नंतर देव पुनः चिंतामग्न झाले. पुढे त्यांनी स्तुति केल्यामुळे त्रिगुणांचे बीजरूप जे तुरीय ते क्षेत्र उत्पन्न झाले. त्याची ब्रह्मदेवासह सर्व देवांनी स्तुति केली व प्रसन्न होऊन त्या तुरीय तीर्थाने ब्रह्मदेवास पवित्र केले; आणि ते तुरीय-क्षेत्र गणपतीची सेवा करीत तेथेच राहिले. यालाच तीर्थराज असे ह्मणतात. या तीर्थाची देवांनी उत्तम तऱ्हेने स्तुति केली तेंव्हा ते तीर्थ मूर्तिमंत प्रकट होऊन देवास इष्ट असे वर देते झाले व देवानीही त्या तीर्थाचे नाव सर्वतीर्थ असे ठेवले. या तीर्थांत स्नान केले ह्मणून एका ब्राह्मणाचा मूर्ख मुलगा बुद्धिमान झाला. सुरथ नांवाचा मालवी राजा राज्य करीत असता त्याच्या नगरीवर विदर्भराजाने स्वारी केली आणि त्याचा पराभव केला. सुरथाने अन्य राजांचे साह्य मिळवून विदर्भराजाचा पराभव करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो विफल झाला. तेंव्हा सुरथाला वनवासाचा प्रसंग आला. पुढे ब्राह्मणांच्या सांगण्या-वरुन तो मयूरक्षेत्राला आला आणि सर्व तीर्थामध्ये भक्तिपूर्वक स्नान करून शंकराचे व गणपतीचे पूजन करून व प्रसाद घेऊन परत गेला. त्याने पुनः सैन्य जमविले, तेंव्हा गणेशप्रसादाने त्याला विदर्भांचा पराभव करता आला आणि पुनः तो राजा स्वराज्याचा स्वामी झाला. पुढे त्याने गणेशभक्ति अखंड ठेवली

ह्मणून तो स्वानंदवासाचा अधिकारी झाला. असाच अनुभव वैश्य-शूद्रास, फार तर काय, पण चांडाळासमुद्धा आलेला आहे सर्व पापांचा नाश करून पुण्याचा संचय करणारे तीर्थ जर कोठे असेल. तर ते मयूरक्षेत्रातील सर्वतीर्थ हेच होय. धनप्रिय नावाचा एक मनुष्य होता. त्याने द्रव्यासाठी मातृपितृहत्या, ब्रह्महत्या अशी अनेक पापें केली होती. विष घालून त्याने हजारो लोकांचा जीव घेतला होता. त्याचे भाषण मधुर व रूप साधूचे असे, ह्मणून सर्व लोक त्याला फसत. पुढे त्याची सर्व पापे उदयास आली, तेव्हा राजाने त्याचे घरदार लुटून त्याला दंडकारण्यात पाठवून दिले. तेथे आल्यावरही त्याने लोकांस फसविण्याचा आपला धंदा सुरू केला. एकदा पाळत ठेऊन एका श्रीमंत वैश्यास लुटण्याचा त्याने बेत केला वाणी पुढे व हा मागे असे मार्गक्रमण सुरू झाले. वाटेत त्यांना ती तीर्थमयी महानदी लागली. तेथे स्नान करून ते दोघेही पुढे गेले. पुढे वाण्यास गाठून धनप्रियाने त्याला विष घालून ठार मारले. धनप्रियही काही काळाने मरण पावला दोघांनाही सर्वतीर्थांचे स्नान झाले होते ह्मणून स्वानंद लोकाला जाण्याचा मार्ग प्रकट झाला, व व अंती ते शुद्धचित्त होऊन व ज्ञान प्राप्त करून मोकळे झाले.

## मयूरक्षेत्रातील पंचतीर्थे

**सूत**:- ऋषिहो! या मयूरक्षेत्रात पंचतीर्थे मुख्य आहेत. मध्यभागी गणेशतीर्थ आहे. नंतर ज्ञान देणारे कपिलतीर्थ, अज्ञान नाहीसे करणारे व्यासतीर्थ, भीमतीर्थ (येथे पांडव जो भीम त्याने तपश्चर्या करून वर मिळविला होता व भीमासुराला मारण्याचे सामर्थ्य मिळविले होते.) व स्वधर्म प्राप्त करून देणारे ऋषितीर्थ,

अशी ही पांच तीर्थे आहेत. या तीर्थांत स्नाने केली असता (गणेश, भीम, ऋषि, व्यास, कपिल) गाणेशब्रह्मप्राप्ति होते. दक्षिणेकडील शिवशक्तितीर्थ, उत्तरेकडील लक्ष्मीनारायणतीर्थ, हीही तीर्थे उत्तमच आहेत. याचप्रमाणे उत्तरेकडील सूर्य-संज्ञा-तीर्थ व दक्षिणेकडील प्रकृति-पुरूष-तीर्थं हीही तीर्थे इच्छिलेले मनोरथ पूर्ण करणारो आहेत. याचप्रमाणे सिद्धिबुद्धि, लक्ष, लाभ, मूषक, मयूर, मौद्गल, गार्त्समद, शुक, दत्तात्रय, अशी अनेक महत्वाची तीर्थे येथे आहेत. सारांश पृथ्वीवर असे कोणतेही तीर्थ नाही की ज्याचे मुख्य स्वरूप मयूरक्षेत्रामध्ये वसति करून राहिले नाही. या सर्वांचा विस्तार स्कंद पुराणामध्ये उत्तम प्रकारे केलेला आहे ह्मणून येथे संक्षेप केला आहे.

## देवद्वार गणेशाची विधियुक्त पूजा-देवकृत गणेश स्तुति -गणेशद्वारा कामाचे वाटप

सूत :- येथील नित्य यात्रेचा प्रकार असा आहे:- प्रथम मयूरेशाची सहपरिवार पूजा करून नंतर अष्टगण, शमी, मंदार, दूर्वा, मुद्गल, शुक योगी, नंतर शक्ति, सूर्य, विष्णु, शंकर अशा क्रमाने या सर्वांची पूजा करावी. नंतर पुराणश्रवण करून गणपतीला नमस्कार करावा आणि मग घरी जावे गर्भागारातील जी देवाची स्थाने आहेत, तेथे जाऊन प्रत्येक गणपतिभक्तांने बल्लाळ, कपिल ढुंढी, वक्रतुंड, महोदर, हेरंब, गणनाथ, विघ्नेश, विघ्नहारक, भालचंद्र, शूर्पकर्ण, ज्येष्ठराज, गजानन आणि महोत्कट ह्या चवदा गणपतीच्या विभूति आहेत. यांचीही पूजा करावी. याप्रमाणे दक्षिण, उत्तर, पश्चिम या दिशावर गणपतीच्या विभूति आहेत, त्यांचे ज्ञान

करून घेऊन त्यांची यथासांग पूजा करावी. तसेच पुलहादि मुख्यमुख्य ऋषि आहेत, त्यांचीही पूजा करावी. याप्रमाणे सांगून भृशुंडीने मयूरक्षेत्राचे वर्णन संपविले आणि आपण स्तब्ध राहिला. नंतर देवांनी गणपतीची स्तुति केली, तेंव्हा प्रत्यक्ष वेद प्रकट होऊन त्यांनी देवास तेजस्वी व ब्रह्ममय असे मयूरक्षेत्र प्रत्यक्ष नेऊन दाखविले तेंव्हा देवांनी विधियुक्त पूजा करून गणपतीविषयीची आपली भक्ति प्रकट केली. त्यांनी गणपतीची स्थापना भाद्रपद शुद्धचतुर्थीचे दिवशी मध्यान्हकाळी केली. त्याच दिवशी सोमवार व स्वातीनक्षत्र होते. माघ शुक्ल अंगारकी चतुर्थीला देवांनी स्थापन केलेल्या मूर्तीमधून चतुर्भुज, मयुरारूढ, सिद्धिबुद्धियुक्त, भालचंद्र, महोदर, पाशांकुशधर, शूर्पकर्ण, गजवदन, एकदंत अशा स्वरूपाने गणपति प्रकट झाले. तेंव्हा देवांनी परमेश्वराची स्तुति केली ती अशी: ‘ हे अनादिरूपा! मयूरारूढा! स्वानंदनाथा! सकल प्रकाशका! मन व वाणी ही नसतानाही, मन व वाणी यांच्यामध्ये राहणाऱ्या, गणनाथा! तूं स्तुतिस योग्य आहेस. आम्ही तुला नमस्कार करतो. तू अज, पुराण, सर्वपूज्य, सर्वगामी, आनंदरूप, हृदयस्थ, चारी ब्रह्मांचा चालक, व सद्रूप असा आहेस. तुला आम्ही नमस्कार करतो. तू आपल्या स्वतःच्या बुद्धिने प्रेरित होऊन ही सृष्टि उत्पन्न केली आहेस. आणि या जगात त्वंपदरूपी सगुण ब्रह्मे आहेत, त्या सर्वांचा स्वामी जो तू व निर्गुणरूपाने सर्वव्यापी जो तू, अशा या स्वसंवेद्य तुला आम्ही नमस्कार करतो. तू नित्य सुखस्वरूप आहेस. सगुण–निर्गुण–शून्य आहेस. समाधीमध्यें प्रकट होणारा आहेस. अयोगरूपाने मायाशून्य आहेस. त्या तुला आमचा नमस्कार असो. तूं प्रभु, भक्तांस सुख देणारा व शांति देणारा, गजवदन, चतुर्भुज

...दंत, त्रिनेत्र, महोदर, पाशधर, सिद्धिदाता, सर्वव्यापी, सत्यसंकल्प ...धर, शूर्पकर्ण, सृष्टिकर्ता, सृष्टिपिता, सृष्टिहंता, दीनवत्सल, शक्ति- ...र सुर्यरूप, हेरंब, मयूरेश, मयूरध्वज, विघ्नेश आहेस. आम्ही तुला ...स्कार करतो. तू ब्रह्मांचे ब्रह्म आहेस. तुझी आम्ही स्तुति काय ...वी! वारंवार नमस्कार करणे हेच काय ते आमचे कर्तव्य ...हे. आम्ही तुझे भक्त आहोत, आमचे रक्षण कर.' गणपतिने ... स्तोत्र ऐकून त्यास दृढ भक्ति दिली. ब्रह्मदेवाकडे सृष्टि ...त्पन्न करण्याचे काम, विष्णूकडे पालनाचे काम, शंकराकडे ...ष्टिसंहाराचे काम दिले. या सर्वांस त्यांनी सांगितले की, 'तुम्ही सर्वांनी नित्य माझे स्मरण करीत असावे.' तसेच शक्तीला ...न भिन्न पदार्थ उत्पन्न करून जीवाला मोहात पाडण्याचे व ...त्याकडून कर्म करविण्याचे काम करण्याला व कर्मांचा आधार जो ...र्यरूपी आत्मा त्याला चराचर सृष्टि धारण करण्याचे काम सांगून त्यासही ...झे विस्मरण होऊ देऊ नका, असे प्रभुने सांगितले. आणि ...त्येकास त्याच्या कार्याला लागणारे सामर्थ्य, शक्ति, स्थाने, आयुधे, ...व वाहने इत्यादि देऊन आपण अंतर्धान पावले. देवांनीही गणपतीची ...पूजा करून आपापल्या कार्यास जाण्यास संकल्प केला व आपल्या ...सर्वांनी मयूरेशाची सेवा करून आपापले कर्म करण्यास गेले. शंकराने मात्र तेथे कांही दिवस राहून तपश्चर्या केली आणि तो ...गणपतीच्या अनुज्ञेने महादेव हें पद मिळविता झाला.

## गणपतीद्वारा कामासुराला शांतियोगाची दीक्षा

सूत :- शौनकादि ऋषिंनो ! कामासुराचे पुढे काय झाले हे आदिदेवीला विचारल्यावरून, महाकाली इत्यादि देवीस ती सांगू

लागली ते ऐका : मुद्गलाने उपदेश केल्याप्रमाणे शिवप्रमुख देव मयूर-क्षेत्राला गेले. विधियुक्त यात्रा करून गणपतीची त्यांनी तपश्चर्या केली, त्याचे भजन केले आणि एकाक्षरी मंत्राचा जप केला. देवांच्या भक्तीचे स्वरूप पाहून विनायक संतुष्ट झाले आणि मयूरावर आरूढ होऊन देवास प्रसन्न झाले. देवांनी केलेली स्तुति 'ऐकल्यावर कामासुराला मी शांत करतो, काळजी करूं नका, लौकरच मी कर्माचा संप्रदाय प्रस्थापित करतो.' असे वर गणपतींनी दिले. गणपति अंतर्धान पावल्यावरही देवांनी एकनिष्ठेने गणपतीचे भजन चालू ठेवले. इकडे देवांस वर मिळाल्याची बातमी आकाशवाणीमुळे कामासुराला कळली; तेंव्हा राक्षसमंडळात असा निश्चय झाला की, 'सर्व देवांस ठार मारून नाहीसे केले ह्मणजे गणपतीचा अवतार होण्याचे कारणच राहणार नाही. याकरिता गिरिकंदरात जाऊन वनवासी देवांचा संहार करावा.' याप्रमाणे निश्चय ठरल्यावर कुंभकर्णप्रमुख राक्षस अरण्यात गेले व देवांस धरून मारहाण करू लागले. देवांनी गणपतीला दीन वाणीने हाक मारली, तेंव्हा मूषकध्वज, मयूरारूढ, पाशांकुशधर व तेजस्वी अशा रूपाने हेरंब प्रकट झाले. सर्व देव स्तोत्रे गातगात गणपतीच्या पाया पडले, तेंव्हा 'माझे नांव विकट आहे या नावाने माझे भजन करा. मी कामहीन आहे, हे ध्यानात ठेवा. मायेच्या सुखापेक्षा विकटाचे प्रेम संपादन करून घ्या, ह्मणजे माझे रूप पाहण्यास तुम्ही समर्थ व्हाल.' असा त्यांनी देवांस उपदेश केला

नंतर देव निष्काम होऊन शुद्धचित्त झाले पहा की देहपोषण किंवा यश ह्या हेतूनी जी भक्ति होते, ती सकाम भक्ति होय. आणि स्वधर्म साधनाकरिता जी देवाची सेवा, हिला निष्काम भक्ति असे

म्हणावे. देवांनी गणपतीला प्रार्थना केली, त्याचे तात्पर्य हे होते की, 'कामासुराच्या प्राबल्याने आम्हास आमचे कर्तव्यकर्म करवत नाही व आमचा धर्म आम्हास पाळता येत नाही.' देवास त्यांनी धीर दिला आणि कामासुराबरोबर युद्ध करण्यास सिद्ध व्हा अशी आज्ञा केली.' नंतर शस्त्रे घेऊन देवांनी युद्ध करण्यास सुरुवात केली. अर्थातच भयंकर युद्ध सुरु झाले. देवांच्या मारापुढे कुंभकर्णाचे किंवा त्याच्या सेनेचे काही चालले नाही. ते पळून कामासुराकडे गेले व तेजोरूपी विकट आपल्यावर चालून आल्याचा वृत्तांत सांगू लागले. ते ऐकून कामासुराने प्रतिज्ञा केली की 'मी मारीन किंवा मरेन पण आज शत्रूशी दोन हात करेन.' कुंभकर्णाला विकट दिसला असेल तर उत्पत्तीनाशमुक्त असलाच पाहिजे. तेंव्हा मला मरणाची भीति मुळीच नाही. चला, आपली सर्व सेना घेऊन देवांचा समाचार घेऊंया.' शुक्रासुराने राक्षसांस पुष्कळ बोध केला; परंतु त्याचा कांही उपयोग झाला नाही आणि राक्षससेना देवांचा पराभव करण्याकरिता शस्त्रास्त्रे सज्ज करून मोठ्या समारंभाने बाहेर निघाली. कामासुराला पाहिल्यावर देवांना आपल्या जीवाची भीती वाटली; परंतु गजाननानी त्यांस धीर दिल्यावर त्यांची सर्व भीती नष्ट झाली, इतकेच नव्हे तर शस्त्रास्त्रे सज्ज करून राक्षससैन्यावर ते सर्व इतक्या त्वेषाने तुटून पडले की, ती सर्व विजयी म्हणवून घेणारी राक्षससेना रणांगणातून पळून जाऊं लागली; तथापि बलिप्रमुख दैत्यसचिवांनी आपल्या वाणीने राक्षसांस एकत्र केल्यावर त्यांचा हल्ला देवांस हटविता आला नाही. शिवाय दैत्यांकडे संजीवनी देउन पुनः जिवंत करणारा शुक्र असल्यामुळे दैत्य पुनः पुनः जिवंत होत आणि देवास सतावून सोडीत. विष्णु, शंकर यांनी या युद्धांत विलक्षण पराक्रम केले. शेवटी गणेशाचा अवतार जे विकट

महाराज त्यांच्या तेजस्वी पराक्रमाने दैत्यसैन्याचा सर्वस्वी पराभव झाला. कामासुराचे पुत्र मारले गेले आणि सर्व दैत्यसैन्यांत जिकडे तिकडे हाहाःकार सुरू झाला. कामासुराने त्या दिवशी सर्वांस आश्चर्य उत्पन्न करणारा पराक्रम करून शंकरविष्णूस धरणीवर मूर्च्छित पाडले, आणि सिंहनाद करून आपल्या सैन्यास पुनः युद्धास प्रवृत्त केले. दुःष्पुर, बलीं इत्यादि सचिवांस देवसैन्याचा समाचार घ्यावयास सांगून कामासुर हा गणपतीशी द्वंद्वयुद्ध खेळण्याकरिता समोर येऊन उभा राहिला; परंतु गणपतीचे दिव्य ऐश्वर्य, असह्य तेज, नजर ठरणार नाही अशी अंगकांति, मन हरण करून घेणारे नेत्रयुगुल हे पाहून व त्याची गंभीर वाणी ऐकून कामासुर धैर्य विगलित झाला आणि ज्यावेळी गणपतीनी आपले स्वरूप प्रगट केले, त्याला आपली ईश्वरी व्यवस्था समजून दिली, धर्मनाश करून अधर्माचा प्रभाव त्याच्या राज्यांत भयंकर झाल्यामुळे एकंदर विश्वाची केवढी प्रचंड हानि झाली हे त्याला कठोर वाणीने सांगितले आणि शेवटी त्याचे अज्ञान, त्याची अल्पशक्तिही त्याच्या नजरेस आणली, त्यावेळी तो धैर्यशून्य झाला इतकेच नव्हे पण हतप्रभ, गर्वशून्य, विनम्र होऊन गणपतीच्या पायांवर गडबडा लोळू लागला. त्याने करुणा भाकली आणि भक्तिपूर्वक एक स्तोत्र म्हणून गणेशास प्रसन्न करून घेतले. गणपतीनी त्याला अखंडस्मरण व दृढभक्ति हे दोन वर देऊन 'सकाम कर्म करणाऱ्या सत्कर्मी पुरुषांच्या कर्मांचे फल तूं उपभोगीत जा आणि माझ्या भक्तांना माझीच आठवण नित्य होईल असे कर' अशी आज्ञा करून गणपतीनी कामासुराला शांतियोगाची दीक्षा दिली व स्वस्थानी पाठवून दिले. नंतर शंकर, विष्णुप्रमुख देवांनी परमेश्वराची एकनिष्ठेने भक्तियुक्त स्तुति करून

परमेश्वराचे आशीर्वाद स्वीकृत केले. गणेशानेही देवांस धर्मरहस्य सांगितले आणि आपण अंतर्हित झाले. पुढे देवांनी व देवर्षींनी गणपतीची मूर्ति स्थापन करून भजन–पूजन, कीर्तन आणि प्रवचन इत्यादिकांच्या साहाय्याने गणेशसंप्रदाय वाढविला. असो; ह्या मूर्तीची स्थापना भाद्रपद शुद्ध चतुर्थीला मध्यान्हकाळी झाली म्हणून गणपतीचे वार्षिक उत्सवही भाद्रपद शुध्द चतुर्थीलाच होतात.

## गणेशाचा गुणेश अवतार

सुत :– शौनकादि ऋषिनो ! ही कथा सांगितल्यावर आदिशक्तिने देवीस चक्रपाणि नामक गंडकी नगरीच्या राजाची गोष्ट सांगितली. हा राजा धर्मशील, दाता, नीतीपरायण, शुर व ऐश्वर्यवंत असा होता. अपत्य नाही हीच त्याला एक मोठी चिंता होती. पुढे सूर्यदेवतेची आराधना करून त्या देवतेस राजाने आपल्या उग्रा नामक पत्नीसह तप करून प्रसन्न करून घेतले. पुढे उग्रा गर्भधारण करती झाली. नंतर कांही दिवसांनी त्या गर्भाचे तेज सहन करण्याचे सामर्थ्य उग्रेला नाहीसे होऊन तिचा तो गर्भ जलाशयात पडला समुद्राने त्या गर्भाचे पालनपोषण केले आणि जन्म झाल्यावर समुद्राने ब्राह्मणाचे रूप घेऊन त्या मुलास राजाच्या हवाली केले. ब्राह्मणांनी त्या मुलाचे नांव सिंधु असे ठेवले. हा मुलगा मोठा झाल्यावर बापाची आज्ञा घेऊन वनांत गेला व एका पायावर उभे राहून त्याने सूर्याची दोन हजार वर्षे उग्र तपश्चर्या केली. आणि सूर्य प्रसन्न झाल्यावर त्रैलोक्यविजय, नित्य अमृतपान हे दोन वर देऊन सूर्याने त्यास असे सांगितले की, ‘ ज्यावेळी त्रिगुणशून्य परमात्मा देह धारण करील व तुझ्याजवळील अमृताचे भांडे काढून घेईल, तेंव्हा तुला

मृत्यु प्राप्त होईल.' ही वरप्राप्ति करून घेऊन सिंधु घरी परत आला व सर्वांस आपल्या तपश्चर्येच्या सफलतेचा वृत्तांत त्याने सांगितला. हा वृत्तांत ऐकून आईबापास, इष्टमित्रांस व सर्व लोकांस अतिशय आनंद झाला. पुढे पुत्रावर राज्यकारभार सोपवून चक्रपाणि आपल्या पत्नीसह देहाचे सार्थक करण्यासाठी वनांतरी गेला. सिंधुराजाने लवकरच सर्व राक्षस मंडळी गोळा करून त्रैलोक्यविजय, वेदोक्तकर्मांचा लोप इत्यादि सर्व आसुरी कृत्ये करून आपण स्वतः विषयाच्या आसुरी उपभोगामध्ये निमग्न आणि उन्मत्तपणाने सर्व सद्गोष्टींचा तिरस्कार करीत राहिला. यामुळे सर्व त्रैलोक्यभर अर्थातच हाहाःकार झाला. अधर्माचा नाश करण्यासाठी व धर्माची संस्थापना करण्यासाठी परमेश्वरास साधूंच्या प्रार्थनेवरून जन्म घेणे भाग पडले, या न्यायाने गणपतीनी पार्वतीच्या उदरी गुणेश या नावाने अवतार घेतला. सिंधुच्या दूतांनी ही बातमी सिंधूस सांगितली. शिवाय त्यालाही पुष्कळ दुश्चिन्हांनी असे भविष्य सुचवून ठेवले होते की, 'तुझा अंत लवकरच होणार.' ही आपत्ति टाळण्यासाठी त्याने हजारो राक्षस गुणेशाचा नाश करण्याकरता पाठविले, पण गुणेशाने त्या सर्वांस यमलोकी पाठवून दिले. एक दिवस मरीचिनामक महायोगी गुणेशाच्या दर्शनाकरिता कैलासलोकी आले. तेव्हा पार्वती मायामोहित झाल्यामुळे मरीचीची आर्जवे करून त्यास म्हणाली की, ह्या 'मुलावर नित्यशः अनेक संकटे येतात, तेंव्हा त्यांच्या प्रशमनासाठी एखादा मंत्र देऊन ठेवा.' तेव्हा मरीचि ऋषिने हा परमेश्वराचा अवतार असे समजूनही तो त्या मुलाला गणेशकवच शिकविता झाला! एकदा पार्वतीने पार्थिवलिंग तयार करून त्याची पूजा करण्यास आरंभ केला,

तिक्यात 'आई मला भूक लागली, खायला दे' असे बोबडे बोल बोलत व दुडुदुडु धावत गुणेश तेथे आला व लडिवाळपणाने आईचा हात आपल्याकडे ओढू लागला. 'ही देवपूजा आटपते आणि तुला घेते' असे पार्वतीने सांगितले, तरी मुलाची समजूत पडेना. त्याने जास्तच हट्ट धरला, बुक्की मारून ते शिवलिंग खाली पाडले आणि फोडून टाकले! तेव्हा पार्वतीने त्याच्या तोंडात मारली. पण गुणेश आईच्या हाताला इतके कडकावून चावला की, त्यांतून भडभडा रक्त वाहू लागले. हे पाहून व मार बसेल असे जाणून गुणेश तेथून पळून गेला. इकडे लिंगभंग झाले हे पाहून पार्वतीला खूप वाईट वाटले. 'असले पोर झाले नसते तरी बरे' असे कपाळ पिटून ती म्हणू लागली व देहत्याग करण्याचा तिने निश्चय केला; इतक्यात धावत धावत मुलगा तिच्या जवळ आला, त्याला धरून ती आता काठीने मार देणार तो, गुणेशाने शंकरस्वरूप धारण केले. शंकराला पाहताच पार्वतीने हातातील काठी टाकून दिली. तोच गुणेशाने आपले स्वरूप प्रकट केले व पळू लागला! पार्वती त्याला मारण्याकरिता पाठीमागे धावूं लागली. याच वेळी कर्दम नावाचा राक्षस द्विजरूपाने पुढे येऊन त्याने गुणेशास गिळून टाकले. पार्वती तेथे आल्यावर त्याने तिला सांगितले की, शिवाशपथ तुझा मुलगा मी पाहिला नाही. पण नाही या शद्बाबरोबरच त्याच्या तोंडातून गुणेशाने उडी मारली आणि त्याला अशी एक वज्रमुष्टि लगावली की, त्याच्यायोगाने तो तत्क्षणी मरण पावला. याप्रमाणे गुणेशाने अनेक प्रकारच्या बालक्रिडा करून आईबापास रमविले. हा गुणेश गौतमादि मुनींच्या मुलांबरोबर खेळावयास जाई, पण तेथे अतिशय खोड्या करीत असे. विष्णु, शंकर इत्यादि

देवांनीही तेथेच मुनींची मुले होऊन गुणेशसंगतीत सुखाचा अनुभव घेतला. ह्या बालवयातच गुणेशाने अनेक राक्षसांचा वध केला. इकडे सिंधु राक्षस जास्तच उन्मत्त होऊन त्याने इंद्र, चंद्र, वरुण, ब्रह्मा, विष्णु इत्यादि देवास कारागृहात टाकले. शंकराला नेण्याकरता सिंधूने कमलासुराला पाठवले, तेंव्हा गुणेशाने युद्ध करून कमलासुराला ठार मारले. या गुणेशाचे सत्व पाहण्याकरिता इंद्राने पर्जन्य पाडून, ब्रह्मदेवाने त्याच्या खेळगड्यांस लपवून ठेवून व शंकरदर्शनाला आला असता गुणेशाला नमस्कार न करून गुणेशाला त्रास देण्यासाठी पुष्कळ खटपट केली, पण गुणेशाने आपल्या अमोघ शक्तिसामर्थ्याने पर्जन्यास हटविले, आपणच आपल्या संवगड्यांची रूपें घेतली इतकेच नव्हे, तर सर्व चराचर स्वरूप झाला आणि श्वासाच्या प्रवाहाबरोबर ब्रह्मदेवास अनंत ब्रह्मांडे दाखविता झाला. अशा अनेक लीलांनी गुणेशाने (मयूरेशाने) आपल्या ठिकाणी सर्वांची भक्ति निर्माण होईल असे केले. घेतली. शिक्षा करावयास पाठविलेल्या शिवगणांस श्वासाने ढकलून देऊन त्याने शंकरालाही दाखवून दिले की, 'तू केवळ पराधीन आहेस.' पुढे लवकरच गुणेशाने सिंधु राक्षसाचा वध करून सर्व विश्वाची पीडा नाहीशी केली. नंतर मयूरेशाचा सिद्धिबुद्धीशी गांधर्व पद्धतिने विवाह झाला.

## विकट अवतार समाप्ति

सूत :- नंतर आदिशक्तीने देवीस सांगितले की, एकदा सूर्याने अरुणाला त्याच्या विनंतीवरून गणेश दीक्षा दिली, तेंव्हा त्याला समजले की, हे सर्व विश्व व या विश्वांतील देवदेवता केवळ गणेशाधार आहेत व गणेशाश्रय आहेत. हे समजल्यावर त्याने

गणपतीची मूर्ति स्थापन केली आणि भक्ति करीत मुख्यांशाने तेथे राहून आपल्या अल्पांशांनी सूर्याचे सारथ्य करू लागला. एकदा तामिस्रासुर या नांवाचा एक राक्षस सूर्याचा ग्रास करून त्याला गिळण्याकरता आला. हा राक्षस सूर्य व छाया यांच्यापासूनच उत्पन्न झाला होता. त्याला सूर्याने अनेक वर दिले. त्याचाच प्रभाव म्हणजे आसुरी मुलाने बापास गिळणे हा होय! पुढे सूर्याने गणपतीचे स्मरण केल्याबरोबर तो प्रकट झाला आणि तामिस्राचा नाश करून सूर्यास व सर्व जगतास सुख देता झाला,

( विकटचरित्र समाप्त )

# सप्तम खंड

—०—

## [ विघ्नराजचरित्र ]

### मरुतांचा अवतार व इंद्राचे कपट

सूतः– हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु यांचा विष्णूने संहार केला. तेंव्हा दितीला अतिशय दुःख झाले. या दुःखाचा उपशम करण्यासाठी तिने आपल्या पतीची सेवा एकनिष्ठपणाने केली. कश्यप ऋषि (दितीचा पति ) प्रसन्न झाल्यावर तिने त्याच्यापाशी असा वर मागितला की, ' मला इंद्रघ्न ( इंद्राला मारील असा ) पुत्र आपल्यापासून प्राप्त